मागास क्षेत्र अनुदान निधी (BRGF) या केंद्र पुरस्कृत योजनेतंर्गत जिल्हा/ तालुका स्तरावर प्रकल्प व्यवस्थापन कक्ष स्थापन करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
शासन निर्णय क्रमांक - बीआरजीएफ२००९/प्र.क्र.१४९ /पंरा-६
मंत्रालय , मुंबई - ४०००३२.
दिनांक - ३१ मार्च, २०१०.

**प्रस्तावना :**

मागास क्षेत्र अनुदान निधी ही १००% केंद्र पुरस्कृत योजना राज्यातील १२ जिल्हयांमध्ये राबविण्यात येत आहे. मागास भागाच्या विकासासाठी ही योजना अत्यंत महत्वपुर्ण आहे. सन २००९-१० या आर्थिक वर्षासाठी सदर योजनेतंर्गत मंजूर करण्यात आलेल्या जिल्हा आराखडयांच्या अंमलबजावणीसाठी निधी वितरीत करण्यात आला आहे. प्रस्तुत मंजूर आराखडयानुसार या योजनेचे सुयोग्य नियोजन व अंमलबजावणी करणे आवश्यक आहे. त्याकरीता योजनेच्या मार्गदर्शिकेतील मुद्दा क्र- ३.२३ अनुसार अंमलबजावणी स्तरावर म्हणजे ग्रामपंचायतींना तज्ञ मनुष्यबळाचे सहकार्य उपलब्ध करण्याबाबत केंद्र शासनाचे निर्देश आहेत. तसेच दिनांक ११ फेब्रुवारी २०१० रोजी झालेल्या योजनेतंर्गत उच्चाधिकारी समितीच्या बैठकीमध्ये जिल्हा/ तालुका स्तरावर प्रकल्प व्यवस्थापन कक्ष स्थापन करण्यासाठी जिल्हयांनी कंत्राटी पध्दतीने किंवा आऊटसोर्सिंग पध्दतीने तज्ञ मनुष्यबळाचे सहकार्य उपलब्ध करण्यास मान्यता देण्यात आली आहे. याबाबी विचारात घेता मागास क्षेत्र अनुदान निधी योजनेच्या प्रभावी अंमलबजावणीसाठी ग्रामीण स्थानिक स्वराज्य संस्थांच्या स्तरावर १) अभियंता २) लेखापाल ३) संगणक माहिती नोंदणीकार ४) समाज प्रवर्तक (Community Mobiliser) या प्रकारचे तज्ञ मनुष्यबळ नियुक्त करण्यास्तव मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

स्थानिक संस्थाना म्हणजे ग्रामपंचायती, पंचायत समिती व जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणांना नियोजन, अंमलबजावणी व सनियंत्रण करण्याकरिता व्यावसायीक तज्ञांची आवश्यकता विचारात घेता मागास क्षेत्र अनुदान निधी योजनेअंतर्गत १) अभियंता २) लेखापाल ३) संगणक माहिती नोंदणीकार ४) समाज प्रवर्तक या स्वरुपाची तज्ञ कंत्राटी पध्दतीने, वैयक्तीक निवडीद्वारे अथवा व्यावसायिक संस्थांमार्फत आउटसोर्सिंग पध्दतीने उपलब्ध करून घेण्यासाठी शासन मान्यता देत आहे.

२. सर्वसाधारणपणे उपरोक्त चार त-हेची क्षमता असणाऱ्या मनुष्यबळ चमुला युनीट असे संबोधण्यात येत आहे. एका युनीटमध्ये अभियंता, लेखापाल, संगणक माहिती नोंदणीकार व समाज प्रवर्तक या पदांच्या सेवा देण्याच्या तज्ञांचा/सल्लागारांचा समावेश राहील. एका युनिटसाठी मेहनताना/ मानधनावर प्रतीमहिना रूपये ४०,००० एवढया पर्यंत खर्च सिमीत ठेवण्यात यावा. त्यासाठी प्रस्तुत चार क्षमतेपैकी एखादया तज्ञाकडे दोन प्रकारची तांत्रीक-तज्ञ क्षमता आणि अर्हता असल्यास व एकच तज्ञ ती पार पाडण्यात लायक असल्यास दोन तांत्रीक बाबीसाठी एकाच तज्ञाची निवड करण्याची मुभा जिल्हयास राहील. मात्र असे करतांना या तज्ञांनी/सल्लागारांनी प्रत्यक्ष ग्रामपंचायत स्तरावर अनेक ग्रामपंचायतींना जाऊन मार्गदर्शन करणे व प्रात्यक्षिक मदत (Handholding) करणे अभिप्रेत असल्याने युनिटमध्ये प्रत्येक तांत्रिक सेवेसाठी स्वतंत्र तज्ञ असणे उचित राहिल किंवा कसे हे तपासून निर्णय घ्यावा, जिल्हा स्तरावर प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा यांच्या अधिनस्त एक युनीट कार्यरत राहील व

सुरूवातीला तालुकास्तरावर गट विकास अधिकारी, पंचायत समिती यांच्या अधिनस्त एक युनीट कार्यरत राहील.

३. **निवड पध्दत** :- जिल्हयामधील मंजूर युनीट्स मधील तज्ञांची निवड वर नमूद केल्याप्रमाणे आउटसोर्सिंद्वारे किंवा कंत्राटी पध्दतीने करण्यात यावी.

**४. आउटसोर्सिंगद्वारे निवडीची प्रक्रिया :**

आउटसोर्सिंगद्वारे निवड करावयाच्या तज्ञाच्या सेवा अशा क्षेत्रातील नामांकीत संस्थेमार्फत घेण्यासाठी संस्थेची निवड करण्यास्तव स्थानिक वृत्तपत्रामध्ये जाहिरात देण्यात यावी. आऊटसोर्सिगसाठी संस्था निवडतांना नामांकित संस्थेकडून देकार (Offer) मागवून, तांत्रिक क्षमता व पात्रता तपासून, त्यापैकी किमान मोबदल्यात ज्या संस्था तयार होतील त्यांची निवड करावी. याबाबत मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी संबधीत संस्थेशी ११ महिन्याचा करार (Agreement) करावा,

**५. वैयक्तिक कंत्राटी पध्दतीने निवडीची प्रक्रिया :**

या वैयक्तिक तज्ञ सेवांची निवड मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांच्या अध्यक्षतेखाली खालील समितीमार्फत करण्यात यावी. निवड समितीची रचना पुढीलप्रमाणे राहील.

| | |
|---|---|
| १) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद | : अध्यक्ष |
| २) प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा | : सदस्य सचिव |
| ३) मुख्य लेखा व वित्त अधिकारी | : सदस्य |
| ४) उप मुख्य कार्यकारी अधिकारी (ग्रामपंचायत) | : सदस्य |
| ५) समाज कल्याण अधिकारी जिल्हा परिषद | : सदस्य |

मनुष्यबळाची वैयक्तीत तज्ञामधून निवड करण्यास्तव स्थानिक वृत्तपत्रांमध्ये जाहिरात देऊन अर्ज मागवावेत. प्रतिसादानुसार व आवश्यकतेनुसार छाननी करण्यासाठी लेखी परीक्षा व मुलाखत किंवा निव्वळ लेखी परिक्षा किंवा निव्वळ मुलाखत याबाबतचा निर्णय निवड समितीने घेऊन शासनाच्या विहीत नियमाप्रमाणे सदर तज्ञाच्या सेवा अकरा महिन्यासाठी कंत्राटी पध्दतीने उपलब्ध करून घ्याव्यात. याबाबत नेमणूकीच्या पात्रतेबाबतच्या अटी व शर्ती **परिशिष्ट -अ** मध्ये नमूद केल्याप्रमाणे राहतील. तज्ञांसाठी वयोमर्यादेची अट नाही, मात्र तज्ञ काम करण्यास मानसिक व शारिरीक दृष्टया सक्षम आहे व क्षेत्रिय स्तरावर जाऊन मार्गदर्शन करू शकेल याची खात्री करावी. अंतिमत: निवड झालेल्या तज्ञांना / सल्लागारांना नियुक्ती देतांना **परिशिष्ट -ब** मध्ये नमूद केल्याप्रमाणे संबधिताशी करारनामा करण्यात यावा.

६.मानधनावरील खर्च :

वरील पदांच्या मानधन / मेहनतान्यावरील खर्च मागास क्षेत्र अनुदान निधी योजनेतंर्गत जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेच्या स्तरावर प्रकल्प व्यवस्थापन कक्षासाठी (PMU) राखीव ४ टक्के निधीमधून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय शासनाच्या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्र. 201004051313200001 असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( मल्लीनाथ कलशेट्टी )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

एच- ८७-१३०

BRGF GR 31 04 10 lwn2

प्रत -

१) प्रधान सचिव/सचिव (सर्व मंत्रालयीन विभाग)

२) मुख्य सचिव यांचे स्वीय सहायक

३) संचालक (एस आय आर डी) यशदा, पुणे.

४) महालेखापाल, (लेखा परीक्षा व लेखा अनुज्ञेयता ) महाराष्ट्र १, मुंबई.

५) महालेखापाल , (लेखा परीक्षा व लेखा अनुज्ञेयता ) महाराष्ट्र २ नागपूर.

६) विभागीय आयुक्त, औरंगाबाद, अमरावती, नागपूर, नाशिक.

७) मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.

८) जिल्हाधिकारी, गडचिरोली, भंडारा, चंद्रपूर, गोंदिया, नांदेड, हिंगोली, धुळे, नंदूरबार, अहमदनगर, यवतमाळ, औरंगाबाद, अमरावती. (बीआरजीएफ जिल्हे)

९) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद तथा अध्यक्ष, कार्यकारी समिती जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा (बीआरजीएफ जिल्हे).

१०) प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, (बीआरजीएफ जिल्हे).

११) जिल्हा नियोजन अधिकारी, (बीआरजीएफ जिल्हे).

१२) मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद (बीआरजीएफ जिल्हे).

१३) तांत्रिक सहाय्य संस्था नाबार्ड, पुणे/ॲफ्रो अहमदनगर.

१४) निवड नस्ती - का.क्र. पंरा-६.

एन-८७-२

(शासन निर्णय ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र. बीआरजीएफ २००९/प्र.क्र. १४९/पंरा-६ दि. ३१ मार्च, २०१० चे सहपत्र - १)

परिशिष्ट -अ

मागास क्षेत्र अनुदान निधी (BRGF) योजनेतंर्गत कंत्राटी पध्दतीने नियुक्त करावयाच्या तज्ञांसाठी आवश्यक पात्रता व कर्तव्ये

| अ.क्र. | तज्ञाचे नाव | शैक्षणिक अर्हता | मानधन | तज्ञाची कार्यसूची |
|---|---|---|---|---|
| १ | अभियंता | १.मान्यताप्राप्त संस्थेची स्थापत्य अभियांत्रिकी मधील पदवी किंवा पदविका<br>२. मराठीचे ज्ञान आवश्यक | रूपये १२,००० (या व्यतीरिक्त कायम ठोक मासिक स्थानिक प्रवास भत्ता रूपये १,५००) | सहभागी नियोजन, अंमलबजावणी व संनियंत्रण या तत्वास अनुसरून योजनातंर्गत प्रकल्प प्रस्ताव तयार करणे, निविदा प्रारूप तयार करणे, कामावर तांत्रिक दृष्टया देखरेख ठेवून गुणवत्ता नियंत्रण करणे, शासनास व जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेला वेळोवेळी प्रगती अहवाल पाठविणे, याशिवाय लोकांमध्ये स्थानिकगरजेनुसार अभियांत्रिकी विषयक क्षमता निर्माण करणे व यासाठी आवश्यक प्रशिक्षण उपलब्ध करण्याविषयी कार्यवाही करणे. |
| २ | समाज प्रवर्तक | १. मान्यताप्राप्त संस्थेची समाजकार्य विषयक पदवी (BSW) किंवा पदव्युत्तर पदवी (MSW)<br>२. मराठीचे ज्ञान आवश्यक<br>३. संगणकाचे ज्ञान आवश्यक (MS-CIT अथवा तत्सम अर्हता ) . | रूपये १०,००० (या व्यतीरिक्त कायम ठोक मासिक स्थानिक प्रवास भत्ता रूपये १,५००) | सहभागी नियोजन, अंमलबजावणी व संनियंत्रण या तत्वास अनुसरून ग्रामीण भागात लोकांमध्ये स्थानिक आवश्यक मुलभूत गरजे विषयी संवेदनशीलता निर्माण करून गावाचे व्हिजन डॉक्युमेंट तयार करण्यासाठी मदत करणे, ग्रामसभेच्या सशक्तीकरणास मदत करणे, लोकसहभागातून ग्रामसभेच्या मार्फत Wish List तयार करून ग्रामविकासाचे नियोजन करण्यास लोकांना प्रेरणा देणे, त्यासाठी कृतीचर मदत करणे. तसेच महिला सबलीकरणासाठी स्वयंसहाय्यता गटाचे संघटन करणे व लोकप्रबोधनातून साक्षरतेचा प्रसार करणे. |
| ३ | लेखापाल | १. मान्यताप्राप्त संस्थेची वाणिज्य विषयक पदवी किंवा अकॉन्टन्सी डीप्लोमा.<br>२. ग्रामपंचायतीने ठेववयाचे लेखे व हिशोबांचे ज्ञान आवश्यक.<br>३. संगणकावर ग्रामस्थांना हिशोब शिकविण्याची व Handholding ची क्षमता<br>४. संगणकाचे ज्ञान आवश्यक (MS-CIT अथवा तत्सम अर्हता ) . | रूपये ७,००० (या व्यतीरिक्त कायम ठोक मासिक स्थानिक प्रवास भत्ता रूपये १,०००) | बीआरजीएफ कार्यक्रमातंर्गत सपुर्ण लेख्यांचे / खर्चाचे तपशील नोदवीणे, लेखाविषयक आवश्यके दप्तर/ नोंदवहया जतन करणे, योजनेतंर्गत ग्रामपंचायत निहाय बँक अकांऊन्ट विषयक तपशील नोंदविणे. तसेच वरीष्ठानी सोपविलेली जबाबदारी / कामं पार पाडणे. |
| ४ | संगणक माहिती नोंदणीकार | १. बारावी उत्तीर्ण<br>२. मराठी ३० श.प्र.मि. व ईग्रजी ४० श.प्र.मि. टंकलेखन परीक्षा उतीर्ण<br>३.संगणकाचे ज्ञान आवश्यक (MS-CIT अथवा तत्सम अर्हता )<br>४. प्रत्यक्ष कृतीचे ज्ञान | रूपये ५,००० | माहितीचे संकलन करणे, माहिती अद्ययावत ठेवणे. मासिक प्रगती अहवाल व इतर माहिती अहवाल वरीष्ठांना सादर करणे. योजनेतंर्गत प्राप्त झालेल्या अनुदानातून निमार्ण मालमत्तेविषयक माहिती संकलित करणे.तसेच वरीष्ठानी सोपविलेली जबाबदारी / कामे पार पाडणे. |

टीपः वरील सर्व पदांच्या शैक्षणिक अर्हतेविषयी अनुभवास प्राधान्य देण्यात यावे.

(मल्लीनाथ कलशेट्टी)

उपसचिव, महाराष्ट्र शासन

( शासन निर्णय ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र. बीआरजीएफ २००९ /प्र.क्र.१४९/ पंरा- ६,

दिनांक ३१ मार्च, २०१० चे सहपत्र १ )

## परिशिष्ट - ड

## मागास क्षेत्र अनुदान निधी (BRGF) योजनेंतर्गत तज्ञांच्या निवडीनंतर व नियुक्तीपूर्वी करावयाचा करारनामा

## AGREEMENT

This agreement is made at ______________ on this _______ 2009.

**Sub** :- Contractual assignment as **"Engineer/Community Mobiliser/ Accountant/Data Entry Operator"** for Backward Regions Grant Fund (BRGF) programme.

**BETWEEN**

The Project Director, District Rural Development Agency __________________

A Society registered under the Societies Registration Act, 1860 having its registered office at _________________________________ (here in after referred to as the "Institute" which also includes Office of the Block Development Officer, Panchayat Samiti which expression shall unless repugnant to the context or the meaning thereof mean to include its successors of the FIRST PARTY.)

**AND**

**Shri/Smt.** ____________________________________________________

**Address:-** ____________________________________________________

(Hereafter referred to as the SECOND PARTY)

1. Set out below are the terms and conditions under which Shri/Smt. ___________ is given this contractual assignment.

2. Both the parties have agreed and accepted that, only for the sake of convenience, the Second Party shall be referred to as **"Engineer/Community**

एच-८-३

**Mobiliser/Accountant/Data Entry Operator"** during the period of this contract and the Second Party shall carry out the assignment of the duties and responsibilities as specified by the District Rural Development Agency in appointment letter.

3. The said contract shall be valid for a period of **eleven months** commencing from ...../...../.... to ...../...../..... and shall automatically come to an end on the last working day of the eleventh month, unless extended further in writing on such terms and conditions as may be mutually agreed upon. In absence on any prior communication in writing, with regard to offer / or acceptance of extension of period as agreed aforesaid, the contract shall stand terminated on the date stipulated herein above.

4. His/ Her services on contract basis are presently required in the Backward Regions Grant Fund (BRGF) programme implementation and Capacity Building in District Rural Development Agency/ Panchayat samiti.

5. Any decision taken on the basis of inputs pertaining to specific expertise possessed by the assignee appointed on contract, if results into a financial loss to the institution, which if approved to have been caused due to lack of application of mind or dereliction of duty by him/ her the District Rural Development Agency/ Panchayat Samiti shall have right to fix the responsibility upon him/ her and recover the loss from him/ her.

6. This contractual period of **eleventh months** of the assignment may be shortened or terminated any time during this period depending upon the need and progress of the project. In the event of the termination of this assignment before the agreed period, he/ she will be paid for the service rendered by him/ her for carrying out the assignment till the date of termination of the contract and he/ she will hand over his/her charge to the person authorised by Project Director, District Rural Development Agency and he/she will also hand over them, all the

information and documentation possessed or gathered by him/her while rendering the services under this contract.

7. His/Her services will be exclusively utilised for Backward Regions Grant Fund (BRGF) programme implementation and Capacity Building under overall superintendence, control and guidance of Block Development Officer, Panchayat Samiti, ___________ and Project Director, District Rural Development Agency,_______ . He/She will perform his/her duties as per assignment given by Project Director, District Rural Development Agency subject to performance appraisal. However, Project Director, District Rural Development Agency may assign him/her any other function, responsibility or task as regards the overall requirement under Backward Regions Grant Fund (BRGF) programme implementation and Capacity Building in any part of the State.

8. The Project Director, District Rural Development Agency will pay him/her directly a fixed consolidated remuneration of Rs. _________ (Rs. _________) for the period of **eleventh months** which will be reimbursed to him/her in 11 equal installments at the rate of Rs. _______ (Rs. _________) per month or proportionate period there of during the contractual period at the end of every month or thereof on his satisfactory performance of the assignment for that month. The above rate is subject to deduction of any taxes, which are required to be lawfully deducted from his remuneration.

9. No other remuneration, compensation or benefits are admissible to him/her for this contractual assignment except the reimbursement of cost of local travel by way of Permanent Travelling Cost ( PTC) while on tour on official duty. Minimum days of touring should not be less than 15 days.

10. If he/she desires to leave the assignment for any reason before the termination of contractual period, he/she will give three months notice or deposit equivalent remuneration in lieu of notice.

एर्ध-१७-४

11. All materials produced or acquired under the terms of this agreement written graphic, film, and magnetic tape or otherwise, shall remain the property of Project Director, District Rural Development Agency. Rural Development and Water Conservation Department retains the exclusive right to publish or dissemination reports arising from such materials. His/Her responsibility and duties in this paragraph shall continue, not withstanding the termination of this contract for the execution of its other provisions.

12. He/She also agrees that all knowledge and information not within the public domain which may be acquired during the carrying out of this contract, shall be for all the times and for all purposes, regarded as strictly confidential and held in confidence and shall not be directly or indirectly disclosed to any person whatsoever, except with the prior approval of Rural Development and Water Conservation Department, Government of Maharashtra.

13. Clear understanding is given that this is purely a contractual engagement, and this is not a job with District Rural Development Agency.

14. Shri/Smt. ________________ hereby agree and give undertaking that, he/she shall not put along any claim whatsoever to regularise her/him in a temperory or permanent service of the first party.

15. Shri/Smt. __________________ hereby agrees to carry out his/her assignment for District Rural Development Agency/Panchayat Samiti on above terms and conditions and assure to give his services, accordingly for the acceptance of which, he/she has put his signature below.

I agree and accept the assignment

on above terms and conditions.